पर्जन्यवाढीसाठी उपाययोजना (Cloud Seeding)
निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१९/प्र.क्र.१३१(ब)/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक :- २५/११/२०१९

वाचा: -१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१९/प्र.क्र.१३१/आव्यप्र-१ दिनांक :-१०.६.२०१९
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१९/प्र.क्र.१३१/आव्यप्र-१ दिनांक :-२७.६.२०१९
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- पुनर्वि-२०१९/२२४५/प्र.क्र.८४/ब-१ दिनांक :-२३.८.२०१९
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१९/प्र.क्र.१३१(ब)/आव्यप्र-१ दिनांक १९.९.२०१९.
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आव्यप्र-२०१९/प्र.क्र.१३१(ब)/आव्यप्र-१ दिनांक १५.१०.२०१९.

**प्रस्तावना :-**

राज्याच्या दुष्काळी परिस्थितीचा विचार करुन राज्य मंत्रीमंडळाच्या दिनांक २८.५.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत सन २०१९ च्या मान्सून कालावधीत राज्यात कृत्रिम पावसाचा प्रयोग करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१९ च्या मान्सून कालावधीत कृत्रिम पावसाचा प्रयोग करण्याकरिता नियूक्त करण्यात आलेल्या क्याथी क्लायमेट मॉडिफिकेशन कन्सलटंटस (एल.एल.पी) यांना कृत्रिम पावसाचा प्रयोग सुरु झाल्यानंतर करारातील तरतूदीनूसार ६० आणि ९० दिवस पुर्ण झाल्यावर अदा करावयाची एकूण ३० % रक्कम म्हणजेच एकूण रु.९,३०,००,०००/- (रुपये नऊ कोटी तीस लाख फक्त) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

क्याथी क्लायमेट मॉडिफिकेशन कन्सलटंटस (एल.एल.पी) यांच्या देयकातील मूळ रक्कमेवर २% आयकर (TDS) आणि २% जीएसटी टीडीएस वजा करुन त्यांना प्रदान करण्यात यावेत.

याबाबतचे देयक अधिदान व लेखा कार्यालय मुंबई यांना सादर करण्याकरिता श्री अर्जून पालव, लेखाधिकारी आपत्ती व्यवस्थापन प्रभाग आणि श्रीमती राजश्री राऊत, वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

कार्यासन अधिकारी म-११ यांनी उपरोक्त रु.९,३०,००,०००/- (रुपये नऊ कोटी तीस लाख फक्त) एवढा निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे (BEAMS) वितरित करावा.

या कामी होणार खर्च मागणी क्र.सी-६, २२४५ नैसगिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य,८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च (९१) (०१) शोध, बचाव कार्य व लोकांना सुरक्षित स्थळी हलविण्यासाठी आपत्तीच्या प्रतिसादासाठी (संपर्कसाधनासह) खरेदी करावयाची साधनसामुग्री (आपत्ती प्रतिसाद निधीच्या ५ टक्के मर्यादेपर्यंत) (२२४५ २४९९) या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षासाठी पुनर्विनियोजनाने करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८६ / व्यय-९ / २०१९, दिनांक :-२०.५.२०१९ आणि क्र.२२८ / २०१९ / व्यय-९, दिनांक :- १८.८.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१९११२५१५४७४४८७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIRANG SHRIPATI GHOLAP

Digitally signed by SHRIRANG SHRIPATI GHOLAP
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9a2bc3b45be4b89f7c46c4474cf90b8a3c477e34c064494b04238ca50ee43db6, postalCode=400032, street=1ST FLOOR MAIN ROAD, MANTRALAYA, ou=REVENUE AND FOREST DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHRIRANG SHRIPATI GHOLAP
Date: 2019.11.25 15:50:58 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १, महाराष्ट्र, मुंबई.

३. महालेखापाल (लेखा परिक्षा), १ , महाराष्ट्र, मुंबई

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई.

६. कक्ष अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई-३२.

७. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आव्यप्र-६, मंत्रालय, मुंबई.

८. निवडनस्ती.